व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय तांत्रिक विद्यालय/ केंद्र, सदोबा सावळी, ता. आर्णि, जि. यवतमाळ आणि घोडेगांव, ता.आंबेगाव, जि. पुणे या संस्थामधील अस्थायी पदांना दि. ०१/०८/२०१८ ते दि. २८/२/२०१९ पर्यत मुदतवाढ देण्यास मंजूरी देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : अपमु-२०१८/प्र.क्र.७३/व्यशि-४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : २९ सप्टेंबर, २०१८.**

**संदर्भ** :- १) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ४/आस्था-३/मुदतवाढ/२०१७/(१६/१८)/१२५६, दि. ५/९/२०१८
२) वित्त विभाग,शासन निर्णय, क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तिय सुधारणा -१, दि. १०/९/२००१
३) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/ वित्तिय सुधारणा -१,दि. ४/१०/२००४
४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्र. अपमु-२०१८/प्र. क्र.७३/ व्यशि-४, दि. १०/०५/२०१८
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.८/ १६/ आ.पु.क., दि.०७/०९/२०१८

**प्रस्तावना :**

वित्त विभागाच्या दिनांक १०/०९/२००१ च्या शासन निर्णयान्वये व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मुख्य कार्यालय, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, सर्व प्रादेशिक कार्यालये, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय, शासकीय तांत्रिक विद्यालय आणि शासकीय प्रमाणपत्र अभ्यासक्रम या कार्यालयामधील पदांचा आढावा घेण्यात आला आहे. आढाव्याअंती उपरोक्त कार्यालयातील पदांच्या सुधारीत आकृतीबंधास दिनांक २५/०७/२००७ च्या शासन निर्णयान्वये ३३७४ पदांना मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानंतर शासकीय तंत्र विद्यालय/केंद्र सदोबा सावळी ता.आर्णि, जि.यवतमाळ आणि शासकीय तांत्रिक विद्यालय/केंद्र घोडेगांव, ता.आंबेगाव, जि.पुणे या संस्था आदिवासी उपयोजनेंतर्गत सुरु करण्यासाठी प्रत्येकी १३ या प्रमाणे एकुण २६ शिक्षकीय व शिक्षकेत्तर पदे निर्माण करण्यास दिनांक ०१/०२/२००८ च्या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली आहे. सदर अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२००८ पासून ते ३१/०७/२०१८ पर्यंत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयातील अटींच्या अधिन राहून मुदतवाढ मंजूर करण्यात आली आहे. सदर २६ अस्थायी पदांना वित्त विभागाने दिनांक ०७/०९/२०१८ च्या शासन निर्णयानुसार दि. ०१/०८/२०१८ ते दि. २८/२/२०१९ पर्यत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :**

शासकीय तांत्रिक विद्यालय/केंद्र, सदोबा सावळी, ता.आर्णि, जिल्हा-यवतमाळ आणि शासकीय तांत्रिक विद्यालय/केंद्र, घोडेगांव, ता.आंबेगाव, जि. पुणे या दोन संस्थेतील २६ अस्थायी पदांना दिनांक ०३ जानेवारी, २००८ च्या उच्चस्तर सचिव समितीच्या ४५ व्या बैठकीत मान्यता मिळालेली आहे.

२. सदर योजना पुढे चालू ठेवण्याच्या दृष्टीने खालील २६ अस्थायी पदांची आवश्यकता विचारात घेवून, या २६ अस्थायी पदांना दिनांक ०१/०८/२०१८ ते २८/२/२०१९ पर्यंत मुदतवाढ खालील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र | पदनाम | मुदतवाढ देण्यात आलेल्या पदांचा तपशील | | एकूण पदे |
|---|---|---|---|---|
| | | शासकीय तांत्रिक विद्यालय/ केंद्र, सदोबा सावळी, ता.आर्णि, जि.यवतमाळ | शासकीय तंत्र विद्यालय/ केंद्र,घोडेगांव, ता.आंबेगांव, जि.पुणे | |
| १) | मुख्याध्यापक (वर्ग-२) | १ | १ | २ |
| २) | सहाय्यक अधिव्याख्याता | १ | १ | २ |
| ३) | निदेशक (पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम) | २ | २ | ४ |
| ४) | कनिष्ठ लिपिक | १ | १ | २ |
| ५) | भांडारपाल | १ | १ | २ |
| ६) | चतुर्थश्रेणी कर्मचारी | ३ | ३ | ६ |
| ७) | पहारेकरी | ३ | ३ | ६ |
| ८) | सफाईगार | १ | १ | २ |
| **एकूण** | | **१३** | **१३** | **२६** |

**<u>अटी व शर्ती</u> :-**

(१) ज्या प्रयोजनासाठी उपरोक्त पदे निर्माण करण्यात आली आहेत, त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करण्यात यावा.

(२) अस्थायी पदांपैकी कोणतीही पदे ६ महिने किंवा त्यापेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त नाही, याची खातरजमा करावी.

३. या प्रस्तावावर होणारा खर्च मागणी टी-५, २२०३ तंत्र शिक्षण जनजाती क्षेत्र उपयोजना, पंचवार्षिक यांजनांतर्गत योजना ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१)(०२) माध्यमिक शालांत परिक्षा पूर्व तांत्रिक शिक्षणाचा विकास (जिल्हा) (२२०३.०७३९)(०१)

वेतन या लेखा शिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व याबाबत होणारा खर्च सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षामध्ये मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०७/०९/२०१८ च्या शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वे निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०१८०९२९१७३२५१४९०३** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2018.09.29 17:37:24 +05'30'

**( संतोष रोकडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-०१.
२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/अमरावती/नागपूर. (संचालनायामार्फत)
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
५) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई ( संचालनालयांमार्फत)
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)
८) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालये (संचालनायांमार्फत)
८) मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय/केंद्र, सदोबा सावळी, ता. आर्णि, जि. यवतमाळ (संचालनालयामार्फत)
९) मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय/केंद्र, घोडेगांव, ता.आंबेगाव,जि. पुणे, (संचालनालयामार्फत )
१०) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
११) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई (व्यशि-१, व्यशि-२, व्यशि-३, )
१३) निवड नस्ती.